स्वयंसेवी संस्थांनी चालविलेल्या ऊसतोड कामगारांच्या मुलासाठी आश्रमशाळा,विदयानिकेतन,विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या आश्रमशाळांना सहाय्यक अनुदान वितरित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग.
शासन निर्णय क्रमांक :- विभशा-२०११/प्र.क्र.२६९ /मावक-६
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक :- ३ सप्टेंबर २०११

पहा :- शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अंदाज-२०११/प्र.क्र.९३/२०११/
अर्थसंकल्प-३, दिनांक ०६.०५.२०११

शासन निर्णय :-

सामाजिक न्याय विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांनी चालविलेल्या ऊसतोड कामगारांच्या मुलासाठी आश्रमशाळा,विदयानिकेतन,विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या आश्रमशाळांना सन २०११-१२ या आर्थिक वर्षात मंजूर वित्तीय तरतूदीच्या ७५% सहाय्यक अनुदान बी.डी.एस. वर उपलब्ध करून देण्यात आलेले आहेत. सामाजिक न्याय विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थांमार्फत चालविलेल्या ऊसतोड कामगारांच्या मुलासाठी आश्रमशाळा, विदयानिकेतन,विमुक्त जाती व भटक्या जमातीच्या आश्रमशाळांना पुढीलप्रमाणे निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | सन २०११-१२ ची अर्थसंकल्पीय तरतूद (रू.लक्ष) | वित्त विभागाच्या मान्यतेनुसार बी.डी.एस.द्वारे वितरीत करावयाची तरतूद (रू.लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १ | स्वयंसेवी संस्थांच्या आश्रमशाळा व मुलोदयोगोत्तर आश्रमशाळा चालविण्यासाठी सहाय्यक अनुदान | २२२५-०७५-३ | ३६७७१.३७ | २०२३०.१० |
| २ | ऊसतोड कामगारांच्या मुलाच्या शिक्षणासाठी स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान | २२२५-२५२-२ | ९१.९० | ४५.३१ |
| ३ | विदयानिकेतन शाळा चालविण्यासाठी स्वयंसेवी संस्थांना सहाय्यक अनुदान | २२२५-२६०-२ | २५५.०० | ९४.९२ |

२. प्रस्तावित वितरीत करावयाचा निधी खर्च केल्यानंतर त्याबाबतचा जिल्हानिहाय व संस्थानिहाय विदयार्थीसंख्येसह झालेल्या खर्चाचा तपशिल सादर केल्यानंतरच उर्वरित निधी उपलब्ध करुन देण्यात येईल.त्याप्रमाणे जिल्हानिहाय व संस्थानिहाय विदयार्थीसंख्येसह झालेल्या खर्चाचा तपशिल प्राप्त झाला नाही आणि उर्वरित निधी वितरित करण्यास वित्त विभागामार्फत विलंब झाल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक, विजाभज संचालनालय, पुणे यांची राहील.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५७/व्यय-१४, दि.३.९.२०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९०३१७०१०२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सही/-
(कृ.त्रि.कदम)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ ( लेखा परिक्षा) (लेखा अनुज्ञेयता ) मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-२ ( लेखा परिक्षा) (लेखा अनुज्ञेयता ) नागपूर.
संचालक, विजाभज, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी,
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षक, मुंबई / मुंबई उपनगर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
अवर सचिव, व्यय-१४, वित्त.विभाग, मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव, अर्थसंकल्प, सा.न्या.व वि.स.विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती-मावक-६.